**इतर मागास बहुजन कल्याण विभागाच्या क्षेत्रीय कार्यालयांच्या आस्थापनेवरील गट-अ आणि ब (राजपत्रित) पदावर प्रतिनियुक्तीने निवड करण्याकरीता प्राप्त अर्जांची छाननी करून पसंतीक्रमाची यादी सक्षम प्राधिकाऱ्याकडे सादर करण्याकरीता त्रिसदस्यीय समिती गठीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२१/प्र.क्र.३४/आस्थापना-२,**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : ३० मार्च, २०२२.

**वाचा-** १. शासन निर्णय, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, क्र.आस्थाप्र-२०१७/ प्र.क्र.०८/ आस्थापना-२, दि. १४/१/२०२१

२. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. एसआरव्ही-२०११/प्र.क्र.१३७/ कार्यासन-१२, दि. १७/१२/२०१६

**प्रस्तावना :-**

इतर मागास बहुजन कल्याण विभागाच्या संदर्भाधिन क्रमांक १ येथील दि.१४/१/२०२१ च्या शासन निर्णयान्वये विभागाच्या क्षेत्रिय कार्यालयांच्या आस्थापनेवरील पदांचा सुधारीत आकृतिबंध मंजूर करण्यात आला आहे. सद्य:स्थितीत, इतर मागास बहुजन कल्याण विभागाचे क्षेत्रिय स्तरावरील कामकाज, प्रादेशिक स्तरावर- प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण व जिल्हा स्तरावरील कामकाज- सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण यांच्यामार्फत करण्यात येत आहे. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या क्षेत्रिय स्तरावरील कार्यालयीन रचनेप्रमाणे इतर मागास बहुजन कल्याण विभागाची क्षेत्रिय स्तरावरील कार्यालये तातडीने सुरु करण्याचे प्रस्तावित आहे. त्यानुषंगाने पदभरतीसाठी सेवाप्रवेश नियम तयार होऊन नियमित पदभरती होईपर्यत, सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधिन क्र.२ येथील दि.१७/१२/२०१६ च्या शासन निर्णयातील परिच्छेद ६(५) मधील तरतुदींप्रमाणे, इतर मागास बहुजन कल्याण विभागाच्या क्षेत्रीय कार्यालयांच्या आस्थापनेवरील गट-अ आणि ब (राजपत्रित) पदावर प्रतिनियुक्तीने निवड करण्याकरीता प्राप्त अर्जांची छाननी करून पसंतीक्रमाची यादी सक्षम प्राधिकाऱ्याकडे सादर करण्याकरीता त्रिसदस्यीय समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय-**

इतर मागास बहुजन कल्याण विभागाच्या संदर्भाधिन क्र. १ येथील दि.१४/१/२०२१ च्या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेल्या इतर मागास बहुजन कल्याण विभागाच्या क्षेत्रीय कार्यालयांच्या आस्थापनेवरील गट-अ आणि ब (राजपत्रित) पदांवर सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधिन क्र.२ येथील दि.१७/१२/२०१६ च्या शासन निर्णयातील परिच्छेद ६(५) मधील तरतुदीप्रमाणे प्रतिनियुक्तीने निवड करण्याकरीता प्राप्त अर्जांची छाननी करून पसंतीक्रमाची यादी सक्षम प्राधिकाऱ्याकडे सादर करण्याकरीता खालीलप्रमाणे त्रिसदस्यीय समिती गठीत करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | पदनाम | समितीमधील पद |
|---|---|---|
| १ | सचिव/प्रधान सचिव/अपर मुख्य सचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई | अध्यक्ष |
| २ | संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे | सदस्य |

| | | |
|---|---|---|
| ३ | सह सचिव/उप सचिव (आस्थापना-२), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ४ | अवर सचिव/कक्ष अधिकारी (आस्थापना-२), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई | समिती सचिव |

२. उक्त समितीने शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. एसआरव्ही-२०११/प्र.क्र.१३७/ कार्यासन-१२, दि. ७/१२/२०१६ मधील तरतुदींप्रमाणे कार्यवाही करावी.

३. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२२०३३११२४२२१८४३४ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

HENDRE SHRINATH VASANT

Digitally signed by HENDRE SHRINATH VASANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=OTHER BACKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT, 2.5.4.20=b3272ba57bff80f4bbbb05e48f604bf4384ded9504494a9a7b08ac55e72f5cf8, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AE1F9FC513D75E7EE10DDEA796B68C7E42CCD6D1F044CC779FFE2F5CA6313BD2, cn=HENDRE SHRINATH VASANT
Date: 2022.04.01 16:07:02 +05'30'

**( श्रीनाथ व. हेंद्रे )**

कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.मंत्री (इतर मागास बहुजन कल्याण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. राज्यमंत्री (इतर मागास बहुजन कल्याण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. मुख्य सचिव यांचे सह सचिव/उप सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. अपर मुख्य सचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई
५. अपर मुख्य सचिव , सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
६. आयुक्त,समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य,पुणे.
७. संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८. महालेखापाल-१ ( लेखा परिक्षा व लेखा अनुज्ञेयता), मुंबई.
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१०. निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
११. वित्त विभाग ( व्यय -१४/आपुक), मंत्रालय, मुंबई.
१२. सामान्य प्रशासन विभाग ( कार्या- १४), मंत्रालय, मुंबई.
१३. सर्व सह / उप सचिव / अवर सचिव / कक्ष अधिकारी, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय,मुंबई.
१४. निवड नस्ती ( आस्था-२).